चार कृषि विद्यापीठे आणि महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित तरतूदीचे योजनेतर योजनांचे उर्वरित अनुदान वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७१६/प्र. क्र.५१/८-अे,**
**दिनांक : १७ फेबुवारी, २०१७.**

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, मफुकृवि-१७९९/प्र.क्र.१७४/२०-अे, दिनांक १८/१२/२०००,
२) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, लेखानु-२०१६/(प्र.क्र. ४०/१६)/२-अे, दिनांक ११ एप्रिल, २०१६,
३) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, कृषिवि-३७१६/प्र. क्र.५१/८-अे, दिनांक १६ एप्रिल, २०१६,
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६,
५) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, कृषिवि-३७१६/प्र. क्र.५१/८-अे, दिनांक ३० मे, २०१६,
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण -२०१७/प्र.क्र.७/कोषा-प्र-५, दिनांक १७ जानेवारी, २०१७,
७) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१७,

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णय दिनांक १८/१२/२००० अन्वये सन २०००-०१ या आर्थिक वर्षापासून राज्यातील कृषि विद्यापीठांना योजनेतर अनुदान मंजूर करण्यासाठी सुधारित सहायक अनुदान सुत्र विहीत केले आहे. त्यानुसार राज्यातील चार कृषि विद्यापीठे आणि महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांना सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात "मागणी क्र डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण" या मुख्य लेखाशीर्षाखाली "०१ पीक संवर्धन","०३ पशुसंवर्धन" व "०५ मत्स्यव्यवसाय" या उपशीर्षांतर्गत ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च, ३६ सहायक अनुदान (वेतन) या बाबींकरीता तसेच "मागणी क्र. डी-११, ६२१६ गृहनिर्माणासाठी कर्जे, (६२१६ ०२०१) " या उपशीर्षांतर्गत अर्थसंकल्पित उर्वरित २०% मर्यादेत व ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीसाठी १०% मर्यादेत सोबतच्या परिशिष्ट “अ” मधील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मंजुर केलेले **रु. १४९,६५,०३,२००/- (अक्षरी रुपये एकशे एकोन्नपन्नास कोटी, पासष्ट लाख लाख, तीन हजार दोनशे फक्त)** इतके अनुदान खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

**अटी व शर्ती**

१) कृषि विद्यापीठांनी व कृषि परिषदेने उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनांतर्गत योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे.

२) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतीबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची कृषि परिषदेने / विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

४) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अन महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

५) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

६) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट / योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

७) ज्या योजनांतर्गत / योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर/योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

८) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

९) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास / भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

१०) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

११) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि **प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.**

१२) सन २०१६-२०१७ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१३) नियमबाह्य योजना, पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

१४) निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष तसेच वित्त विभागाच्या दिनांक २० एप्रिल, २०१६ व दिनांक १७ जानेवारी, २०१७ च्या परिपत्रकातील अटी व शर्तींचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१५) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

१६) सोबतच्या परिशिष्ट अ मधील विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद केलेल्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत स्तंभ क्र. ७ खाली मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि-२००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे नियंत्रक व संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांच्या नियंत्रणाखालील कार्यरत असलेले या योजनेचे संवितरण अधिकारी सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी वरीलप्रमाणे महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

१७) या प्रित्यर्थचा खर्च सन २०१६-२०१७ च्या अंदाजपत्रकात सोबतचे **जोडपत्र "अ"** मधील विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १६२ (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दिनांक २०/०४/२०१६ सोबतच्या परिशिष्टातील अ. क्र. ९ समोरील तपासणी सूचीनुसार अटी व शर्तींची पूर्तता करुन तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दिनांक ०८/०२/२०१७ नुसार प्रशासकीय विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०२१८१२५०४५२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.02.18 16:59:19 +05'30'

**( प्र. शं. शेटे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे-१,
३. कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
४. कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि.रत्नागिरी,
५. कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, जिल्हा परभणी,
६. कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जिल्हा अकोला,
७. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर/ दापोली/ अकोला/ परभणी,
८. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
९. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर,
११. उपकोषागार अधिकारी, राहूरी, जिल्हा - अहमदनगर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी,
१३. उपकोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा - रत्नागिरी,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला,
१५. उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा - अकोला,
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी,
१७. उपकोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा - परभणी,
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
२१. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२२. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
२३. वित्त विभाग (व्यय-१ / बियुडी १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२४. कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे / ७अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२५. कार्यासन ८-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

## परिशिष्ट - अ

**शासन निर्णय, कृषि व पदु विभाग क्रमांक : कृषिवि-३७१६/प्र. क्र.५१ /८-अे, दिनांक १७/०२/२०१७ सोबतचे परिशिष्ट.**

**(रुपये हजारात)**

| अ. क्र. | लेखाशीर्ष | बाब | आहरण व संवितरण अधिकारी | सन २०१६-१७ करीता अर्थसंकल्पित तरतूद | ८०% मर्यादेत वितरीत केलेले अनुदान. | उर्वरित वितरीत करावयाचे अनुदान. |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. |
| १) | **०१ पीकसंवर्धन** १२० इतर संस्थांना सहाय्य (००) (०१) म.फु. कृ.वि. ला सहायक अनुदान **(२४१५ ००२५)** | ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च | उप विभागीय कृषिअधिकारी, अहमदनगर | १००,५८,९० | ८०,४७,१२ | २०,११,७८ |
| | | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ११,७०,४५ | ९,३६,३६ | १,१७,०४.५० |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | १५५,१७,३१ | १२४,१३,८४.८० | ३१,०३,४६.२० |
| | | | **एकूण** | **२६७,४६,६६** | **२१३,९७,३२.८०** | **५२,३२,२८.७०** |
| २) | **०३ पशुसंवर्धन** १२० इतर संस्थांना सहाय्य (०१) (०१) म.फु. कृ.वि. ला सहायक अनुदान **(२४१५ ०१९७)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर | १२,८४ | १०,२७.२० | १,२८.४० |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | २,८४,४२ | २,२७,५३.६० | ५८,८८.४० |
| | | | **एकूण** | **२,९७,२६** | **२,३७,८०.८०** | **५८,१६.८०** |
| ३) | **०१ पीकसंवर्धन** १२० इतर संस्थांना सहाय्य (००) (१५) म.फु. कृ.वि. ला आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९३८)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर | ९,६०,०० | ७,६८,०० | ९६,०० |
| | | | **एकूण** | **९,६०,००** | **७,६८,००** | **९६,००** |
| ४) | **०१ पीकसंवर्धन** १२० इतर संस्थांना सहाय्य (००) (०२) डॉ. बा. सा. को. कृ. वि. ला सहायक अनुदान **(२४१५ ००३४)** | ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च | उप विभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी. | ३०,८५,९१ | २४,६८,७२.८० | ६,१७,१८.२० |
| | | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ३,६७,०० | २,९३,६० | ३६,७० |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | ५९,७५,२३ | ४७,८०,१८.४० | ११,९५,०४.६० |
| | | | **एकूण** | **९४,२८,१४** | **७५,४२,५१.२०** | **१८,४८,९२.८०** |
| ५) | **०३ पशुसंवर्धन** १२० इतर संस्थांना सहाय्य (००) (०२) डॉ. बा. सा. को. कृ. वि. ला सहायक अनुदान **(२४१५ ०१७९)** | ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च | उप विभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी. | २,३७,६३ | १,९०,१०.४० | ४७,५२.६० |
| | | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ११,१४ | ८,९१.२० | १,११.४० |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | १,००,४१ | ८०,३२.८० | २०,०८.२० |
| | | | **एकूण** | **३,४९,१८** | **२,७९,३४.४०** | **६८,७२.२०** |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६) | **०५ मत्स्यव्यवसाय**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०२) डॉ. बा. सा. को. कृ. वि. ला सहायक अनुदान<br>**(२४१५ ०२४१)** | ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च | उप विभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी. | १,९९,५० | १,५९,६० | ३९,९० |
| | | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ४३,४५ | ३४,७६ | ४,३४.५० |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | ८,६०,२५ | ६,८८,२० | १,७२,०५ |
| | | | **एकूण** | **११,०३,२०** | **८,८२,५६** | **२,१६,२९.५०** |
| ७) | **६२१६, गृहनिर्माणासाठी कर्ज,**<br>(००) (०१) **कृषि विद्यापीठांच्या कर्मचा-यांना घरबांधणी अग्रीम (६२१६ ०२०१)** | ५५, कर्जे व आगाऊ रकमा | उप विभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी | १,६१,८१ | १,२९,४४.८० | ३२,३६.२० |
| | | | **एकूण** | **१,६१,८१** | **१,२९,४४.८०** | **३२,३६.२०** |
| ८) | **०१ पीकसंवर्धन**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (१६) डॉ.बा.सा.को.वि. ला आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९४७)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | उप विभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी. | ७,३७,९० | ५,९०,३२ | ७३,७९ |
| | | | **एकूण** | **७,३७,९०** | **५,९०,३२** | **७३,७९** |
| ९) | **०१ पीकसंवर्धन**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०३) डॉ. पं. दे. कृ. वि. ला सहायक अनुदान **(२४१५ ००४३)** | ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | ८९,८१,५७ | ७१,८५,२५.६० | १७,९६,३१.४० |
| | | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | १२,४२,२० | ९,९३,७६ | १,२४,२२ |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | ११४,६४,१६ | ९१,७१,३२.८० | २२,९२,८३.२० |
| | | | **एकूण** | **२१६,८७,९३** | **१७३,५०,३४.४०** | **४२,१३,३६.६०** |
| १०) | **०५ मत्स्यव्यवसाय**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०३) डॉ. पं. दे. कृ. वि. ला सहायक अनुदान **(२४१५ ०२६८)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | १,२५ | १,०० | १२.५० |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | ३४,९० | २७,९२ | ६,९८ |
| | | | **एकूण** | **३६,१५** | **२८,९२** | **७,१०.५०** |
| ११) | **०१ पीकसंवर्धन**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (१७) डॉ.पं.दे.कृ. वि. ला आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९५६)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला | १,५९,१२ | १,२७,२९.६० | १५,९१.२० |
| | | | **एकूण** | **१,५९,१२** | **१,२७,२९.६०** | **१५,९१.२०** |
| १२) | **०१ पीकसंवर्धन**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०४) म. कृ. वि. ला. सहायक अनुदान **(२४१५ ००५२)** | ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च | **उप विभागीय कृषि अधिकारी, परभणी** | ५७,१६,७७ | ४५,७३,४१.६० | ११,४३,३५.४० |
| | | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | ७,५७,६० | ६,०६,०८ | ७५,७६ |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | ८६,७५,६५ | ६९,४०,५२ | १७,३५,१३ |
| | | | **एकूण** | **१५१,५०,०२** | **१२१,२०,०१.६०** | **२९,५४,२४.४०** |
| १३) | **०३ पशुसंवर्धन**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०४) म. कृ. वि. ला. सहायक अनुदान **(२४१५ ०२०३)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | **उप विभागीय कृषि अधिकारी, परभणी** | ७,८३ | ६,२६.४० | ७८.३० |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | १,५९,८८ | १,२७,९०.४० | ३१,९७.६० |
| | | | **एकूण** | **१,६७,७१** | **१,३४,१६.८०** | **३२,७५.९०** |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १४) | **०१ पीकसंवर्धन**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (१८) व.ना.म.कृ.वि. ला आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक फी प्रतिपूर्तीसाठी सहायक अनुदान **(२४१५ ०९६५)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | **उप विभागीय कृषि अधिकारी, परभणी** | ६,४०,०० | ५,१२,०० | ६४,०० |
| | | | **एकूण** | **६,४०,००** | **५,१२,००** | **६४,००** |
| १५) | **०१ पीकसंवर्धन**<br>१२० इतर संस्थांना सहाय्य<br>(००) (०५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेला सहायक अनुदान **(२४१५ ००६१)** | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | **सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे** | १,०३,४० | ८२,७२ | १०,३४ |
| | | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | | २,०३,७७ | १,६३,०१.६० | ४०,७५.४० |
| | | | **एकूण** | **३,०७,१७** | **२,४५,७३.६०** | **५१,०९.४०** |
| | **एकूण योजनेतर योजना** | | | **७७९,३२,२५** | **६२३,४५,८०** | **१४९,६५,०३.२०** |